गट विकास अधिकारी व सहाय्यक गट विकास अधिकारी यांच्या कामाचे सुधारीत वाटप करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

### शासन परिपत्रक क्रमांकः मविसे १०/२०१४/प्र.क्र.२०१/आस्था-३(अ)

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, मुंबई ४०० ००१
तारीख : २१ नोव्हेंबर, २०१४

**परिपत्रक:-**

गट विकास अधिकारी व सहाय्यक गट विकास अधिकारी यांच्या कामाचे सुधारीत वाटप करणेबाबतचा दिनांक ३०.१०.२०१४ चा शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. तरी सदर शासन निर्णय सर्व संबंधित अधिकाऱ्यांच्या निदर्शनास आणून देण्याबाबत सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना निर्देश देण्यात येत आहेत.

सदरचा शासन निर्णय या परिपत्रकान्वये महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१४११२११५४८३५२०२० असा आहे. सदर परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SHINDE VIJAY DATTATRAYA

Digitally signed by SHINDE VIJAY DATTATRAYA
DN: CN = SHINDE VIJAY DATTATRAYA, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = GAD, CID - 917064
Reason: I am approving this document
Date: 2014.11.24 12:05:44 +05'30'

**वि.द.शिंदे**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.प्रधान सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
२. महासंचालक, यशदा, पुणे
३. सर्व विभागीय आयुक्त
४. संचालक, वनामती, नागपूर
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
६. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
७. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई
८. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर
९. निवडनस्ती, आस्था-३(अ)

५१

**गट विकास अधिकारी आणि सहाय्यक गट विकास अधिकारी यांच्या कामाचे सुधारित वाटप करणे...**

**महाराष्ट्र शासन**
**शासन निर्णय क्र. मविसे 10/2014/प्र.क्र.201/आस्था-3(अ)**
**ग्रामविकास व जलसंधारण विभाग,**
**बांधकाम भवन, 25, मर्झबान रोड, मुंबई 400001.**
**दिनांक : 30 ऑक्टोबर, 2014**

**वाचा :-**

१) शासन निर्णय,ग्रामविकास व जलसंधारण विभाग,क्र.मविसे१०/प्र.क्र.१०४(ब)/२०११/आस्था-३, दिनांक ३ ऑगस्ट, २०१२.

२) शासन निर्णय, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, क्र.मविसे १०/प्र.क्र.२४७/२०१२/आस्था ३(अ), दिनांक २४ जुलै, २०१३

**पार्श्वभूमी :-**

उपरोक्त शासन निर्णय संदर्भ क्र.१ अन्वये सर्व पंचायत समित्यांसाठी सहाय्यक गट विकास अधिकाऱ्यांची ३५१ पदे नव्याने निर्माण करण्यांत आली आहेत. संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये सहाय्यक गट विकास अधिकारी, गट-ब या पदाच्या कामाबाबत मार्गदर्शक सूचना देण्यात आल्या आहेत. सहाय्यक गट विकास अधिकारी यांच्या कामाच्या वाटपाबाबत मार्गदर्शक सूचना जरी दिल्या असल्या तरी, बहुतांशी पंचायत समित्यांमध्ये सहाय्यक गट विकास अधिकारी यांच्या कामाच्या वाटपामध्ये एकसुत्रता नसल्याचे निदर्शनास आलेले आहे. सहाय्यक गट विकास अधिकाऱ्याच्या काम वाटपा मध्ये सुधारणा करण्याची आवश्यकता निर्माण झाल्याने राज्यातील विभाग, जिल्हा व गट स्तरावरील अधिकाऱ्यांकडून काम वाटपाबाबत प्रस्ताव मागविण्यात आले. या प्रस्तावाची विभाग स्तरावर तपासणी करुन सहाय्यक गट विकास अधिकाऱ्यांच्या काम वाटपाचे सुधारित आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

सहाय्यक गट विकास अधिकाऱ्यांच्या काम वाटपाबाबतचा यापूर्वीचा संदर्भ क्रमांक २ मधील दिनांक २४ जुलै, २०१३ चा शासन निर्णय या शासन निर्णयाद्वारे अधिक्रमित करण्यात येत आहे. गट विकास अधिकारी या पदावरील ताण कमी करुन पंचायत समिती स्तरावरील प्रशासनाची निर्णय क्षमता व गुणवत्ता वाढवून प्रशासन गतिशील करण्याच्या उद्देशाने पंचायत समिती स्तरावर

सहाय्यक गट विकास अधिकारी या पदाची निर्मिती करण्यात आली. सहाय्यक गट विकास अधिकाऱ्यांच्या काम वाटप, गोपनीय अहवाल लिहिणे आणि इतर अनुषंगिक विषयासंदर्भात पुढील प्रमाणे सुधारित शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**<u>शासन निर्णय :-</u>**

**सहाय्यक गट विकास अधिकारी यांच्या कामांची तीन भागांत विभागणी करण्यात येत आहे:-**

**१)** **<u>विशिष्ट विषयांचा स्वतंत्र कार्यभार :-</u>** अनुसूची १ मधील ४ विषयांचा स्वतंत्र कार्यभार सहाय्यक गट विकास अधिकारी यांना देण्यात येत असून या विषयाचे संपूर्ण आर्थिक व प्रशासकीय अधिकार सहाय्यक गट विकास अधिकारी यांना असतील. जिल्हा/तालुका स्तरावर अनुसूची १ मधील विषयामध्ये बदल करण्याचे/फेरफार करण्याचे अधिकार असणार नाहीत. अपवादात्मक परिस्थितीत विषयामध्ये बदल करावयाचा असल्यास अशा बदलास त्या पंचायत समितीच्या संबंधित गट विकास अधिकारी (गट अ) यांनी शिफारस केल्यास आणि मुख्य कार्यकारी अधिकारी यांची तशी खात्री झाल्यास विभागीय आयुक्तांच्या मान्यतेने अनुसूची १ मधील विषयामध्ये बदल/फेरफार करता येतील. त्यासाठी शासनाकडे मान्यतेसाठी प्रस्ताव पाठविण्याची आवश्यकता नाही. मात्र हा बदल ज्या गट विकास अधिकारी (गट अ) यांच्या शिफारशीच्या आधारावर केलेला आहे त्या गट विकास अधिकाऱ्याच्या कालावधीपुरताच मर्यादीत असेल, म्हणजेच **विभागीय आयुक्तांनी विषयाच्या फेरफारास दिलेली मान्यता त्या गट विकास अधिकाऱ्याच्या/ सहाय्यक गट विकास अधिकाऱ्याच्या कालावधीपुरतीच मर्यादीत असेल. अशी मान्यता नियमित बाब असणार नाही**.

२) **<u>सहाय्यक गट विकास अधिकाऱ्यांमार्फत विविध विषयांच्या संचिका सादर करणे अनिवार्य:-</u> अनुसूची २ मध्ये दिलेल्या विषयाच्या संचिका सहाय्यक गट विकास अधिकारी यांच्यामार्फत गट विकास अधिकाऱ्यांकडे सादर करणे बंधनकारक असेल.** या अनुसूची २ मध्ये दिलेल्या विषयांमध्ये फेरफार करण्याचे अधिकार मुख्य कार्यकारी अधिकारी यांना असणार नाहीत. तथापि या विषयांमध्ये काही अतिरिक्त विषयाच्या संचिकांचा समावेश करावयाचा असल्यास मुख्य कार्यकारी अधिकारी सक्षम असतील. सहाय्यक गट विकास अधिकाऱ्यांना भविष्यात सक्षम करण्याचा उद्देश असल्याने अनुसूची २ मधील विषयात स्थानिक पातळीवर वाढ करणे अपेक्षित आहे.

**३)** **<u>वरिष्ठ प्रशासकीय अधिकाऱ्यांनी दिलेली कामे:-</u>** मुख्य कार्यकारी अधिकारी/ अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी / गट विकास अधिकारी यांना आवश्यकता वाटल्यास, वरील

अनुसूची १ व २ व्यतिरिक्त कोणतेही अतिरिक्त काम सहाय्यक गट विकास अधिकारी यांचेकडे सोपवू शकतील.

**सहाय्यक गट विकास अधिकारी यांचे गोपनीय अहवाल लिहिणे :-**

सहाय्यक गट विकास अधिकारी (गट-ब) यांचे गोपनीय अहवाल गट विकास अधिकारी (गट-अ) यांनी लिहावेत. **अनुसूची 1** मधील बहुतांश विषय हे जिल्हा स्तरावर अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी यांचेकडील असल्यामुळे सहाय्यक गट विकास अधिकारी (गट ब) यांच्या गोपनीय अहवालाचे पुनर्विलोकन करण्याचे अधिकार अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी यांना असतील. **कृषि, समाज कल्याण, महिला व बाल कल्याण आणि पशुसंवर्धन विभागातील** सर्व अधिकाऱ्यांचा/कर्मचाऱ्यांचा गोपनीय अहवाल सहाय्यक गट विकास अधिकारी यांनी लिहावा आणि पुनर्विलोकनासाठी संबंधित खाते प्रमुखांकडे सादर करावा.

**सहाय्यक गट विकास अधिकारी यांचेकडे अतिरिक्त कार्यभार सोपविणे:-**

गट विकास अधिकारी (गट-अ) ज्यावेळी रजेवर असतील किंवा सदरचे पद रिक्त असेल अशावेळी गट विकास अधिकारी (गट-अ) या पदाचा कार्यभार सहाय्यक गट विकास अधिकारी यांचेकडे सोपविणे अनिवार्य असेल. यामध्ये बदल करावयाचा असल्यास मुख्य कार्यकारी अधिकारी ठोस कारणासह प्रस्ताव विभागीय आयुक्तांमार्फत शासनाकडे मान्यतेसाठी सादर करणे बंधनकारक असेल.

महाराष्ट्र विकास सेवेतील सहाय्यक गट विकास अधिकारी हे भविष्यात पदोन्नतीने गट विकास अधिकारी, पंचायत समिती या पदाचा कार्यभार सांभाळणार असल्याने त्यांना भविष्यासाठी सक्षम करणे हा राज्य शासनाचा हेतू आहे. त्यामुळे वरील शासन निर्णयाची तंतोतंत अंमलबजावणी करण्याची जबाबदारी विभागीय स्तरावर उपआयुक्त (आस्थापना) आणि मुख्य कार्यकारी अधिकारी यांची राहील. वरील शासन निर्णयाची सर्व संबंधितांनी अंमलबजावणी करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

वि. गिरिराज

**(वि.गिरिराज)**

**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत -

१. विभागीय आयुक्त (सर्व)
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)

५५

शासन निर्णय, क्र.मविसे-१०/२०१४/प्र.क्र.२०१/आस्था-३ (अ),दि.३०ऑक्टोबर,२०१४ चे सहपत्र.

**अनुसूची क्र.१**

**सहाय्यक गट विकास अधिकारी यांच्याकडे स्वतंत्रपणे सोपविलेल्या कामांची सूची.**

१) सहाय्यक गट विकास अधिकारी यांच्याकडे **कृषि, समाजकल्याण, महिला व बालकल्याण आणि पशुसंवर्धन विभागाचा स्वतंत्र कार्यभार** असेल, तसेच या चार विभागांकरिता प्रथम अपिलीय माहिती अधिकारी म्हणून काम पहातील.

२) **ग्रामपंचायत - पाणी शुध्दीकरण** :- नवसंजीवनी योजना, हिरवे/पिवळे/लाल कार्ड संनियंत्रण

३) ग्रामपंचायत कर्मचा-यांच्या सेवाविषयक सर्व बाबी.

४) तालुका मोफत कायदे विषयक सल्लागार समितीचे सचिव म्हणून काम करणे.

५) तालुका तक्रार निवारण अधिकारी.

६) एम.आय.एस. तालुका MIS समन्वयक अधिकारी म्हणून काम पहाणे (मासिक प्रगती अहवाल सहाय्यक गट विकास अधिकारी यांच्या स्वाक्षरीने सादर करणे.

७) गट विकास अधिकारी गट-अ हे शासकीय कामानिमित्त दौ-यावर असतील अशा वेळी सहाय्यक गट विकास अधिकारी हे निवासी प्रशासकीय अधिकारी म्हणून दैनंदिन कामकाज पाहण्यासाठी जबाबदार असतील.

**अनुसूची क्र.२**

**सहाय्यक गट विकास अधिकारी यांच्यामार्फत सादर करावयाचे विषय / संचिका.**

१) पंचायत समिती स्तरावरील सर्व आस्थापना विषयक बाबी.

२) पंचायत समितीचा अर्थसंकल्प तयार करणे.

३) पंचायत राज समितीचे अनुपालन अहवाल.

४) लोकलेखा समितीचे अनुपालन अहवाल.

५) विभागीय आयुक्त यांना तपासणी अहवाल.

६) ग्रामपंचायतीच्या कायदेशीर बाबी.

७) ग्रामपंचायत यांच्या मासिक सभा व ग्रामसभांचे संनियंत्रण.

८) पंचायत समिती स्तरावरील पूर्ण टपालाची पाहणी, वाटप, आवक-जावक.

९) पंचायत समिती स्तरावरील सर्व कोर्ट प्रकरणे / कायदेविषयक बाबी नियंत्रण.

१०) राजीव गांधी पंचायत सशक्तीकरण अभियान याबाबतच्या प्रशिक्षणाचे संनियंत्रण.

११) महात्मा गांधी ग्रामीण रोजगार हमी योजना.

१२) यशवंत पंचायत राज अभियान.

१३) महात्मा गांधी तंटामुक्त गांव अभियान.

O/C

31/10/2014